**प्राथमिक शिक्षण सेवक भरतीमध्ये डी. एड. (इंग्रजी माध्यम) उमेदवारांकरीता २० टक्के जागा आरक्षित ठेवण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सीईटी-२०१८/प्र.क्र.२०३/टीएनटी-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २७ जून, २०१८

**संदर्भ:-** १) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. पीआरई-२००६/(४८४३/०६)/ प्राशि-१, दिनांक ०२ जुन, २००८
२) शासन शुध्दीपत्रक, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शिसेयो-१८०९/ (प्र.क्र.६२/२००९)/ प्राशि-१, दिनांक ०६ जुन, २००९
३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्र. पीआरई-२०१०/प्र.क्र. ४०७/ १०/प्राशि-१, दिनांक २२ जुलै, २०१०

**प्रस्तावना -**

राज्यातील प्राथमिक शाळेमध्ये प्राथमिक शिक्षक भरतीमध्ये इयत्ता १२ वी अर्हता तसेच अध्यापक पदविका (डी. एड.) अर्हता इंग्रजी माध्यमातून उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांसाठी २० टक्के जागा शासन निर्णय दि. २०.०६.२००८ अन्वये ठेवण्यात आलेल्या होत्या. राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थांसह खाजगी अनुदानित, अंशत: अनुदानित व अनुदानास पात्र घोषित केलेल्या प्राथमिक, उच्च प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षण सेवक भरती अभियोग्यता व बुध्दीमत्ता चाचणीच्या आधारे “पवित्र” या संगणकीय प्रणालीच्या माध्यमातून करण्याबाबत दि. २३.०६.२०१७ अन्वये शासन निर्णय पारित करण्यात आलेला आहे. सदर शाळांमधील भरती-प्रक्रिया ही एकत्रित स्वरुपाची आहे. बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतूदीनुसार प्राथमिक शाळेतील इयत्ता ६ वी ते ८ वी करीता विषयनिहाय शिक्षक उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. तर, इयत्ता १ ली ते ५ वी करीता विज्ञान व गणित हे विषय नसल्याने त्याकरीता इंग्रजी माध्यमातून शिक्षक उपलब्ध करुन देण्याची आवश्यकता नाही. तसेच, बरेच शिक्षक आता इंग्रजी विषय शिकविण्यास तयार आहेत. इंग्रजी माध्यमाच्या शिक्षकांची ज्या जिल्हा परिषदेस आवश्यकता असेल, ती जिल्हा परिषद भरती-प्रक्रियेमध्ये त्याप्रमाणे इंग्रजी माध्यमातील शिक्षक उपलब्ध करुन घेऊ शकतील. यास्तव, शिक्षक भरती-प्रक्रियेत इंग्रजी माध्यमातून अर्हता प्राप्त केलेल्या उमेदवारांकरीता सरसकट २० टक्के आरक्षण ठेवण्याची आवश्यकता नसल्याने, सदर तरतूद वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्यातील प्राथमिक शाळेतील शिक्षक भरती प्रक्रियेमध्ये इयत्ता १२ वी अर्हता इंग्रजी माध्यमातून व अध्यापन पदविका (डी. एड.) ही अर्हता इंग्रजी माध्यमातून उत्तीर्ण झालेल्या उमेदवारासाठी २० टक्के जागा राखून ठेवण्याबाबचे शासन निर्णय दि. ०२.०६.२००८, शासन शुध्दीपत्रक दि. ०६.०६.२००९ व शासन निर्णय दि. २२.०७.२०१० या निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०६२७१६४९२२०९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dattatray Mane

Digitally signed by Sanjay Dattatray Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5938dfcf55dfa4d20c3c2b25ee54999d774aedb59d71b14cfc2860776279ef16, serialNumber=cc816238ed3c914e2fa2e99da4bc0ba4e1f6947aa23ad145e3dc6a469041090f, cn=Sanjay Dattatray Mane
Date: 2018.06.27 16:54:40 +05'30'

**(सं.द. माने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
५. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
६. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
७. मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य (सर्व), विधान भवन, मुंबई
८. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक
९. मा. प्रधान सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग), मंत्रालय, मुंबई
१०.मा. प्रधान सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई
११.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.आयुक्त, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, पुणे
१३.शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१५.संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे

१६.अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ
१७.विभागीय आयुकत (महसूल विभाग), (सर्व)
१८. सर्व जिल्हाधिकारी
१९.आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
२०.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२१.मुख्य अधिकारी, नगर पालिका / नगरपरिषद (सर्व)
२२.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
२३.सर्व सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२४.शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक), (सर्व) जिल्हा परिषद
२५.निवड नस्ती (टीएनटी-१).